**६३ वी वरिष्ठ गट गादी व माती राज्यस्तरीय अजिंक्यपद कुस्ती स्पर्धा व महाराष्ट्र केसरी किताब लढत २०१९-२० या स्पर्धेसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांक : क्रीविनि-२५२०/प्र.क्र.२/क्रीयुसे-३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २५ ऑगस्ट, २०२०.

**वाचा-**

१. समाजकल्याण सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. राक्रीधो १०९६/ प्र.क्र. ३३०/क्रीयुसे-१, दि. ३१.७.१९९७
२. वित्त विभाग, शासन परीपत्रक, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९ व दि.१३.०३.२०२०
३. समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक २६ मार्च, २०२०

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्यात क्रीडा व खेळाच्या विकासासाठी विविध स्तरावर कार्यरत असलेल्या पंजीबध्द संस्था/संघटनांना शासनातर्फे राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून अधिकृत राज्य/ राष्ट्रीय/ आंतरराष्ट्रीय स्पर्धा आयोजनाकरिता आर्थिक सहाय्य करण्याची योजना संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये कार्यरत आहे.

महाराष्ट्र राज्य कुस्तिगीर परिषद यांच्यामार्फत आयोजित करण्यात आलेल्या ६३ वी वरिष्ठ गट गादी व माती राज्यस्तरीय अजिंक्यपद कुस्ती स्पर्धा व महाराष्ट्र केसरी किताब लढत २०१९-२० या दि. २०.०१.२०२० रोजी संपन्न झालेल्या स्पर्धेस संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये रु.४२.१८ लक्ष इतका निधी मंजूर करण्यात आला होता. मात्र, वित्त विभागाने बीडीएस प्रणालीवर यासाठी निधी उपलब्ध करुन दिला नसल्याने, प्रत्यक्षात कोषागारातून रक्कम काढण्यात आलेली नव्हती. सदर वस्तुस्थिती विचारात घेता, उक्त स्पर्धेसाठी झालेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याकरीता चालु आर्थिक वर्षात रु. ४२.१८ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

दि. २ ते ७ जानेवारी, २०१९ या कालावधीत शिव छत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी, पुणे येथे पार पडलेल्या महाराष्ट्र राज्य कुस्तिगीर परिषद यांच्यामार्फत आयोजित करण्यात आलेल्या ६३ वी वरिष्ठ गट गादी व माती राज्यस्तरीय अजिंक्यपद कुस्ती स्पर्धा व महाराष्ट्र केसरी किताब लढत २०१९-२० स्पर्धेच्या आयोजनावरील खर्चासाठी रु.४२.१८ लक्ष ( रुपये बेचाळीस लाख अठरा लक्ष फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर देयक कोषागारात सादर करून

रु.४२.१८ लक्ष (रुपये बेचाळीस लाख अठरा हजार फक्त) इतक्या रकमेचा धनादेश महाराष्ट्र कुस्तिगीर परिषद (Maharashtra State Wrestling Association) या संघटनेच्या नावाने काढण्यात यावा. सदर रकमेची पोचपावती घेण्यात यावी.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्र. ०३, २२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ (०२) क्रीडा स्पर्धा, (०२) (०३) महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेमार्फत नोंदणीकृत क्रीडा संस्थांना सहाय्यक अनुदान (राज्य) (२२०४ १९४३), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखालील चालू आर्थिक वर्षात मंजूर तरतूदी मधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. यासाठी संबंधित "उपसंचालक व लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे" यांना आहरण व संवितरण अधिकारी व "आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे" यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १३८/१४७१ दि.२०.७.२०२० व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौसं ३४६/व्यय-५, दि.२४.७.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२६१५०५१६८३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2020.08.26 15:10:34 +05'30'

**( स्वाती म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत).
८. सर्व उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत).
९. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१०.वरीष्ठ कोषागार अधिकारी, पुणे ( क्रीडा संचालनालयामार्फत)
११.अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-५/अर्थ-८), मंत्रालय, मुंबई.
१२.अवर सचिव (कार्या.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई
१३.अवर सचिव (क्रीयुसे २) / कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शा.शि.व क्री.वि., मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती, क्रीयुसे-३.